बालगृह, शिशुसदन / अनाथालयातील दत्तक
द्यावयाच्या मुलांना जन्माचे दाखले उपलब्ध
करुन देणेबाबत....

2004071915433800001-2500

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन परिपत्रक क्र.१/२००१/एडीपी-२०००/प्र.क्र.२३/ का-३
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक- ८ जानेवारी २००१.

वाचा- १) केंद्र शासनाचे दि. १४ जुलै १९९९ चे गृहमंत्रालयाचे ऑफिस ऑफ दि जनरल रजिष्टार यांचे पत्र क्र.एचओ /९७८११/ आरआय / ९.८.९९

२) शासनाचे महिला व बाल विकास विभागाचे समक्रमांकाचे दि. १७ फेब्रुवारी २००० चे पत्र.

३) आयुक्त, महिला व बाल विकास विभाग पत्र क्र. मबाविआ/ॲडॉप्शन/ २०००-२००१/का-५अ/ १८०३, दि. ११ ऑक्टोबर २०००.

## परिपत्रक

शासकीय व शासन मान्यता प्राप्त बालगृहे, शिशुसदन, अनाथालय अथवा निरिक्षणगृह इ. संस्थांमध्ये दाखल झालेल्या अनाथ बालकांना जन्माचे दाखले देण्याबाबत येणाऱ्या अडचणी लक्षात घेवून सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्रमांक- १९७१/ ८२ नुसार दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार अनाथ मुलांना जन्माचे दाखले देण्याबाबत केंद्र शासनाच्या गृहमंत्रालयाच्या संदर्भाधीन क्र. १ येथील दि.१४ जुलै १९९९ च्या पत्रान्वये सर्व राज्यांना खालील मार्गदर्शक सुचना दिलेल्या आहेत. या सुचनांची अंमलबजावणी अधिकाऱ्यांनी काटेकारेपणे करावी. :-

### सुरुवातीचा जन्माचा दाखला देण्यासाठी अंवलंबण्याची पध्दती:-

(१) संस्थेने प्राधिकृत केलेल्या व्यक्तिमार्फत प्रतिज्ञापत्र स्वरुपात स्थानिक दंडाधिकारी यांचेकडे जन्म प्रमाणपत्र मिळणेसाठी अर्ज करावा.

(२) जिल्हयाचे मुख्य वैद्यकिय अधिकारी यांनी बालकांचे वय निश्चित करणेसाठी आवश्यक वैद्यकिय तपासणी करावी व त्यांचे प्रमाणपत्राचे अनुषंगाने मा.दंडाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

(३) बालकांच्या जन्म प्रमाणपत्र मुलासाठी दत्तक पालक निश्चित होणेपूर्वी कार्यवाही करावी म्हणजे दत्तक पालकाच्या नावाचा अंतर्भाव प्रमाणपत्रात करता येईल.

(४) मा.दंडाधिकारी यांनी जन्म प्रमाणपत्रात कोणत्या नोंदी असाव्यात याविषयीचे आदेश दयावेत आणि त्याप्रमाणे ज्या परिसरात मूल सापडले असेल त्या नोंदणी अधिकाऱ्याने नोंदी घेवून जन्म प्रमाणपत्र दयावे.

**तीन वर्षावरील मुलांना जन्माचा दाखला देण्याबाबत अवलंबण्याची पध्दती:-**

तीन वर्ष किंवा त्यापेक्षा जास्त वयाच्या बालकांच्याबाबत त्यास दत्तक पालक मिळाले नसल्यास आणि संस्थेला सदर बालकांच्या जन्म प्रमाणपत्राची आवश्यकता असल्यास संस्थेने मा.न्यायालयाला खालील बाबींचा समावेश असलेले प्रतिज्ञापत्र सादर करावे.

अ) बालकाने वयाची तीन वर्षे पूर्ण केली आहे अशी संस्थेची खात्री झाल्याचे नमूद करावे.

ब) सदर बालकाचे दत्तक विधानाबाबत अंतिम कार्यवाही झालेली नाही आणि त्यासाठी वेळ लागण्याची शक्यता आहे किंवा कोणत्याही परिस्थितीत दत्तक विधान होणार नसल्याचे नमूद करावे,

क) सदर बालकाचे जन्म प्रमाणपत्र शैक्षणिक, वैद्यकिय, कायदेशीर हेतूसाठी किंवा इतर कोणत्या कारणांसाठी आवश्यक आहे ते नमूद करावे.

ड) सदर बालकाचे दत्तक विधान होईपर्यंत किंवा ती कायदेशीर सज्ञान होईपर्यंत (जे लवकर असेल ते ) त्या बालकाचे स्थानिक पालक अथवा पालक संस्था त्या बालकाचे पालक राहतील असे नमूद करावे.

त्याप्रमाणे असेही स्पष्ट करण्यात यावे की, तीन वर्षापुढील कालावधीत त्या मुलांना दत्तक घेतले जाणार नाही. जी मुले अनाथ आश्रमातच मोठे होणार आहेत अशांच्या बाबतीत जर यापुढे त्यांना इच्छुक दांपत्याने दत्तक घेतल्यास दत्तक दांपत्यांच्या नावासह दुसरा जन्माचा दाखला (Second Birth Cetificate) देण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. मुख्य वैद्यकिय अधिकाऱ्यांनी अशा बालकांचे वय निश्चित करणेबाबत योग्य ती कार्यवाही करुन त्यांनी दिलेल्या प्रमाणपत्राच्या आधारे सर्वोच्च न्यायालयाच्या निदेशाप्रमाणे संबंधित मुख्य वैद्यकिय अधिकाऱ्यांना बालकांचे वय निश्चित करण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुसार कार्यवाही करावी.

केंद्र शासनाच्या सुचनांमध्ये असेही स्पष्ट करण्यात आले आहे की, अनाथालये, निरिक्षणगृहे, बालगृहे, शिशुगृहे, यामधील व ॲडॉप्शनसाठी जाणाऱ्या बालकांबरोबरच संस्थेबाहेर होणाऱ्या दत्तक विधान प्रक्रियामध्ये (नातेवाईकांचे, मित्रांची मुले दत्तक घेणे ) तसेच औपचारिक स्वरुपाच्या दत्तक विधान प्रक्रिया यासारख्या शहरी भागातील प्रचलित पध्दतीमध्ये बालकांच्या जन्म तारीख नोंदणीबाबत / जन्मपत्राबाबत

कार्यवाही होवू शकते. यासंदर्भात मा.दंडाधिकाऱ्यांनी दत्तकेच्छू पालकांची नोंद जन्म नोंदवहीत करणेबाबत तसेच अशा बालकास दुसरे जन्म प्रमाणपत्र (दत्तकेच्छू पालकांची माहिती व इतर आवश्यक माहितीसह ) देण्याचे आदेश दयावेत. जर बालकांच्या जन्माची नोंद केली नसेल तर मा.दंडाधिकाऱ्यांनी बालकांच्या नैसर्गिक पालकांच्या प्रतिज्ञापत्रानुसार व इतर आवश्यक पुरावे गृहित धरुन बालकांची जन्मतारीख निश्चित करण्याचे आदेश दयावेत. नैसर्गिक पालक नसल्यास जिल्हा मुख्य वैद्यकिय अधिकारी यांनी दिलेल्या प्रमाणपत्रे आधार मा.दंडाधिकारी यांनी याबाबत आदेश दयावेत.

वरील सुचनांप्रमाणे संबंधित जन्म दाखला नोंदणी अधिकारी / कर्मचारी यांनी वरील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे व जन्मनोंद वहीमध्ये तारखेसह आवश्यक त्या नोंदी कराव्यात.

वरील सुचनांचे सर्व संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे असे आदेशित करण्यात येत आहे.

वरील सुचना ग्राम विकास व जलसंधारण विभाग व नगर विकास विभाग यांनी जन्म नोंदणी करणाऱ्या कर्मचारी / अधिकाऱ्याच्या निदर्शनास आणाव्यात व त्याप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सुचना द्याव्यात.

हे आदेश ग्राम विकास व जलसंधारण विभाग व नगर विकास विभागाचे सहमतीने अनुक्रमे त्याचा अनौपचारि संदर्भ क्र. १३४३२ दि. २२.११.२००० व संदर्भ क्र. ३१९ दि. १६.११.२००० अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(राजेंद्र पवार )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद. (सर्व)
जिल्हा महिला व बाल कल्याण अधिकारी. (सर्व)
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
प्रधान सचिव, नगर विकास विभाग
आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
मुख्य अधिकारी, नगरपालिका (सर्व)
निवड नस्ती. का. क्र. १०.

Comp-s/Dictation Yogita